८ ते १० जानेवारी, २०१८ या कालावधीत बंगलोर येथे होणाऱ्या "तिसरे युनिफॉर्म एक्स्पो-२०१८" या प्रदर्शनासाठी श्री सोलापूर रेडिमेड कापड उत्पादक संघ, सोलापूर यांना प्रायोजक शुल्क मंजूर करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग
शासन निर्णय क्रमांक : जावप्र-२९१८/ प्र.क्र.६१/ टेक्स-१ (ब)
तिसरा मजला, मंत्रालय ( विस्तार) ,मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १९ नोव्हेंबर, २०१८.

**प्रस्तावना :-**

बंगलोर येथे होणाऱ्या "तिसरे युनिफॉर्म एक्स्पो-२०१८" या प्रदर्शनासाठी महाराष्ट्र शासनास प्रायोजक म्हणून सहभागी होण्याची विनंती श्री सोलापूर रेडिमेड कापड उत्पादक संघ, सोलापूर यांनी केली होती. त्याअनुषंगाने सदर प्रदर्शनाचे प्रायोजक म्हणून सहभागी होण्याचे शुल्क मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

श्री सोलापूर रेडिमेड कापड उत्पादक संघ, सोलापूर यांनी बंगलोर येथे आयोजित केलेल्या "तिसरे युनिफॉर्म एक्स्पो-२०१८" या प्रदर्शनात प्रायोजक म्हणून सहभागी होण्यासाठी रु. २०,००,०००/- (अक्षरी रुपये वीस लाख फक्त) इतके भागीदारी शुल्क मंजूर करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर रु.२०,००,०००/- इतक्या रकमेमधून १०% टी.डी.एस. वजाती करुन उर्वरित रक्कम रु. १८,००,०००/- ( अक्षरी रुपये अठरा लाख फक्त ) श्री सोलापूर रेडिमेड कापड उत्पादक संघ, सोलापूर या संस्थेस अदा करण्यात यावी. संस्थेने सदरचा खर्च विहित पद्धतीने करुन त्याबाबतचा अहवाल संचालक वस्त्रोद्योग, नागपूर यांना सादर करावा.

| अ.क्र. | संस्थेचे नाव | पॅन क्रमांक | देयकाची रक्कम | टी.डी.एस. (स्तंभ क्र.४ मधील रकमेच्या (१० %) | निव्वळ देय रक्कम |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | SHRI SOLAPUR READYMADE KAPAD UTPADAK SANGH, SOLAPUR | AAJTS३१५७R | रु.२०,००,०००/- | रु.२,००,०००/- | रु.१८,००,०००/- |

२. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ -३, दि.२ एप्रिल, २०१८ अन्वये सन २०१८ -२०१९ च्या प्रथम नऊमाही (डिसेंबर, २०१८ अखेर) आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत खर्चाचा अर्थसंकल्पित निधी एकूण वार्षिक तरतुदीच्या ७० टक्केच्या मर्यादेत खर्च करण्यास परवानगी देण्यात आली आहे. सन २०१८-१९ या वर्षात "मागणी क्र. व्ही-२, २८५२ - उद्योग, २०२ वस्त्र निर्माण, ०८, ग्राहकोपयोगी वस्तू उद्योग, २०२ वस्त्र निर्माण, (०१) (०१) प्रदर्शने, चर्चासत्रे, जाहिरात व इतर अनुषंगिक बाबींकरीता अथसहाय्य (२८५२ ०४९९), २६, जाहिरात आणि प्रसिद्धी " या लेखाशीर्षाखाली रु.४००.०० लाख इतका निधी अर्थसंकल्पित असून त्यापैकी ७०% म्हणजे रु. २८०.०० लाख इतका निधी डिसेंबर, २०१८ पर्यंत खर्च करण्यास उपलब्ध आहे. त्यापैकी आतापर्यंत रु.७३,४६,०५५/- इतकी रक्कम खर्च झाली असून रु. २,०६,५३,९४५/- इतकी रक्कम शिल्लक आहे.

३. वित्त विभागाच्या दि. २ एप्रिल, २०१८ च्या परिपत्रकामधील परिच्छेद क्र. ६ (अ) नुसार "२६, जाहिरात व प्रसिद्धी " या बाबींवर खर्च करण्यास विभागास अधिकार आहेत. तसेच ६ (ब) नुसार उपरोक्त लेखाशीर्षाखाली सन २०१८-१९ करीता रु.४००.०० लाख इतकी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आली आहे. परिच्छेद-६ (क) मध्ये नमूद केल्यानुसार, विभागाच्या दि. २२.१.२०१३ च्या शासन निर्णयानुसार " २६, जाहिरात व प्रसिद्धी" या बाबीवर खर्च करण्यास नियोजन विभाग व वित्त विभागाच्या मान्यतेने विभागास अधिकार प्रदान करण्यात आले आहेत.

४. वित्त विभागाच्या उपरोक्त परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील अ.क्र.२ बाबत नमूद करण्यात येते की, योजनेच्या स्वरुपात अथवा व्याप्तीमध्ये बदल होत नसल्याने नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीची आवश्यकता नाही. तसेच अ.क्र. ८ मधील तपासणी सूचीतील मुद्दयांचीही पूर्तता होत आहे. परिच्छेद क्र. ७ मधील तरतुदी या प्रकरणी लागू नाहीत.

५. परिच्छेद क्र. ७ क) मध्ये नमूद केल्यानुसार, तसचे सदर परिपत्रकातील परिच्छेद क्र. ७ ब), ८ व १० मधील अटी या प्रकरणी लागू असून त्या अटींची पूर्तता सदर प्रकरणी होत आहे. तसेच सदर परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील अ. क्र. ३ बाबत नमूद करण्यात येते की, योजनेच्या स्वरुपात अथवा व्याप्तीमध्ये बदल होत नसल्याने नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीची आवश्यकता नाही. अ.क्र. ९ मधील तपासणी सूचीतील मुद्दयांचीही पूर्तता होत आहे.

६. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. संकीर्ण- २०१६/ प्र.क्र.३१/ कोषा.प्रशा-५, दिनांक १० मे, २०१६ मध्ये कोषागारात देयके पारित करताना घ्यावयाच्या दक्षतेबाबत सूचना देण्यात आल्या आहेत. सदर परिपत्रकातील परिच्छेद- अ) मधील बाबींची प्रस्तुत प्रकरणाशी संबंधित माहिती खालीलप्रमाणे आहे -

१) **विभागास प्रदान वित्तीय अधिकार** :- विभागाच्या क्र. सूतगि-१५११/ प्र.क्र.१५३/टेक्स-१ (ब) , दि. २२ जानेवारी, २०१३ च्या शासन निर्णयानुसार " २६, जाहिरात व प्रसिद्धी " या बाबीखालील खर्च करण्यास विभागास अधिकार प्राप्त झाले आहेत.

२) **मंजूर निधी** :- "मागणी क्र. व्ही-२, २८५२ - उद्योग, २०२ वस्त्रोद्योग, ०८, ग्राहकोपयोगी वस्तू उद्योग, २०२ वस्त्र निर्माण, (०१) (०१) प्रदर्शने, चर्चासत्रे, जाहिरात व इतर अनुषंगिक बाबींकरीता अथसहाय्य (२८५२ ०४९९), २६ जाहिरात आणि प्रसिद्धी " या लेखाशीर्षाखाली रु.४००.०० लाख इतका निधी अर्थसंकल्पित असून त्यापैकी रु. ७३,४६,०५५/- इतका निधी खर्च झाला आहे.

३) **मागील ३ महिन्यांपूर्वी दिलेल्या अनुदानापैकी ७५% किंवा अधिक निधी खर्च झाला आहे** :- श्री सोलापूर रेडिमेड कापड उत्पादक संघ, सोलापूर या संस्थेस सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात यापूर्वी निधी वितरीत करण्यात आलेला नाही.

४) **ज्या लेखाशीर्षाखाली अनुदान वितरित करण्यात येत आहे, त्या लेखाशीर्षांतर्गत एक वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही** :- उपरोक्त लेखाशीर्षांतर्गत एक वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

५) **स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान देताना त्यांचेकडून राज्य शासनास येणे नाही किंवा येणे रक्कम समायोजित करण्यात आली आहे** :- लागू नाही.

६) **वैयक्तिक लाभार्थीचे देयक सादर करताना यादीसह व शक्यतो आधार क्रमांकासह सादर करावे** :- लागू नाही.

७) **बांधकामविषयक प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता देताना सक्षम अधिका-याची मान्यता घेतल्याचा उल्लेख आदेशात असावा** :- लागू नाही.

८) **खरेदी विषयक अद्ययावत प्रक्रिया उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग III/उद्योग-४, दि. १.१२.२०१६ च्या शासन आदेशानुसार करावी व तसा उल्लेख प्रशासकीय मान्यतेत असावा** :- लागू नाही.

९) **साहित्य खरेदीची रक्कम पुरवठादाराच्या नावे ECS द्वारे आहरित करावी**:- लागू नाही.

७. उपरोक्त प्रयोजनासाठी झालेला खर्च " मागणी क्र. व्ही-२, २८५२ उद्योग, ०८ ग्राहकोपयोगी वस्तू उद्योग, २०२, वस्त्रनिर्माण, (०१)(०१) प्रदर्शने, चर्चासत्रे, जाहिरात व इतर अनुषंगिक बाबींकरीता ( २८५२ ०४९९) दत्तमत, २६ जाहिरात व प्रसिद्धी " या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा व सन २०१८-२०१९ या आर्थिक वर्षासाठी असलेल्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

८. परिच्छेद- १ मध्ये नमूद केलेले प्रायोजक शुल्क रु.१८,००,०००/- (रुपये अठरा लाख फक्त) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांच्यामार्फत श्री सोलापूर रेडिमेड कापड उत्पादक संघ, सोलापूर (SHRI SOLAPUR READY-MADE KAPAD UTPADAK SANGH, SOLAPUR) या संस्थेस RTGS द्वारे अदा करण्यासाठी श्री. र. गं. बोड्डू , कार्यासन अधिकारी, रोखशाखा, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२ यांना "आहरण व संवितरण अधिकारी" व श्री. ब. बा. चव्हाण, सहसचिव, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२ यांना " नियंत्रण अधिकारी " म्हणून घोषित करण्यात येत आहे. SHRI SOLAPUR READY-MADE KAPAD UTPADAK SANGH, SOLAPUR या संस्थेचा बँक तपशील खालीलप्रमाणे आहे -

| | | |
|---|---|---|
| Account Holder Name | :- | Shri Solapur Ready-made Kapad Utpadak Sangh |
| Bank Name and Address | :- | Bank of Maharashtra, Sakhar Peth, Solapur. |
| Bank Account Number | :- | ६०२९६०३३९२७ |
| Type of Account | :- | Saving Account |
| IFSC / NEFT Code | :- | MAHB००००४६४ |

९. सदर शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्रमांक सूतगि- १५११/ प्र.क्र.१५३/ टेक्स-१ (ब), दिनांक २२ जानेवारी, २०१३ च्या शासन निर्णयान्वये या विभागास नियोजन व वित्त विभागाच्या मान्यतेने प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ -३,दि.२ एप्रिल, २०१८ मधील तरतुदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१८११२०१४२५३२२२०२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Prasenjeet Karlekar

Digitally signed by Prasenjeet Karlekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-Operation Marketing and Textile, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d219c43caa42a6d2c11a62256b2ff3ad939a420c9fb6fa0cb24c384214bcee8c, cn=Prasenjeet Karlekar
Date: 2018.11.20 14:35:30 +05'30'

**( प्रसेनजीत कारलेकर )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. मंत्री ( वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव , मंत्रालय, मुंबई .
२. सचिव ( वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहायक, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
३. सहसचिव (टेक्स-१(ब)) यांचे स्वीय सहायक, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
४. संचालक वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
५. प्रादेशिक उपसंचालक वस्त्रोद्योग, सोलापूर.
६. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र -१, मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर.
७. महालेखापाल ( लेखा परीक्षा ), महाराष्ट्र -१, मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई .
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई .
१०.सहसचिव, श्री सोलापूर रेडिमेड कापड उत्पादक संघ, ६८५, चाटी गल्ली, सोलापूर- ४१३ ००२.
११.अवर सचिव, १७-सी / कक्ष अधिकारी १६-सी, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१२.कार्यासन अधिकारी, रोख शाखा, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१३. निवडनस्ती ( टेक्स-१ (ब) ), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.